राष्ट्रीय कुष्ठरोग निर्मुलन कार्यक्रमांतर्गत २२३
अस्थायी पदांना मुदतवाढ मिळणेबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कुनिका२०१८/अपदे /प्र.क्र.२३५/आरोग्य-५**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २८ सप्टेंबर,२०२०

**वाचा :**

१) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांकः पदआ-२००७/११७/प्र.क्र.१९/सेवा-१, दि.६ ऑगस्ट, २००७
२) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांकः क्षनिका/अस्थायी पदे २०१०/प्र.क्र.३०५/आरोग्य-५, दि.२१/४/२०११
३) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांकः कुनिका/अपदे-२०१८/प्र.क्र.२३५/ आरोग्य-५, दिनांक १३ मार्च,२०२०
४) शासन निर्णय क्र.पदनि-२०१८/प्र.क्र.४० (भाग-२)/आ-३, दि.२३.०५.२०१८
५) वित्त विभाग, शा.क्र .नि.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. ३१.०८.२०२०
६) सहसंचालक, आरोग्य सेवा (कृष्ठरोग व क्षयरोग), पुणे यांचे पत्र क्र.ससंआसे/कुष्ठवक्षय/आस्था/कक्ष-९९/२२३ अस्थाई पदे/नक्र१६२/३६५१७-१८/२०, दि.१६.०७.२०२०.

**शासन निर्णय :**

राष्ट्रीय कुष्ठरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत १०५४ पदे संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये निर्माण करण्यात आली असून त्यापैकी ३८४ पदे अस्थायी ठेवण्यात आली. या ३८४ अस्थायी पदांपैकी संदर्भांकित क्रमांक २ व ३ च्या शासन निर्णयान्वये ८० % प्रमाणे १७७ अस्थायी पदे स्थायी करण्यात आली आहेत. उर्वरित २०७ अस्थायी पदांचा संदर्भांकित क्रमांक १ च्या शासन निर्णयानुसार मंजूर केलेल्या आस्थापनेच्या आढाव्यात समावेश आहे. संदर्भांकित क्र.३ च्या शासन निर्णयानुसार सदर २२३ अस्थायी पदांना दिनांक ३१.०८.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. तसेच संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये सहायक संचालक आरोग्य सेवा, पालघर येथील कार्यालयातील १६ अस्थायी पदे निर्माण केली असल्याने एकूण २२३ अस्थायी पदे दिनांक ०१.०९.२०२० ते दिनांक २८.०२.२०२१ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर २२३ पदांमध्ये डॉ. बंदोरवाला लेप्रसी हॉस्पिटल, कोंढवा, पुणे येथील पदांचा समावेश आहे.

२. या पदांचा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०२०-२०२१ साठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्र. आर-१
२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०६-सार्वजनिक आरोग्य
१०१-रोग प्रतिबंध व नियंत्रण
(०१) (०१०)- कुष्ठरोग नियंत्रणासाठी पथके व रुग्णालय
सांकेतांक (२२१० ०६६५) (योजनेतर)

सदर शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ३१.०८.२०२० अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००९१४१२१३५७५८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KIRAN VASANTRAO WAHUL

Digitally signed by KIRAN VASANTRAO WAHUL
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=58e32592d7ee16b3f0ea3e5db304272db0568 99514ece7f762990f9b1a0c5049, postalCode=400001, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=2e35734ec976bf5657815fb42c4d25b0 b3c23b4c69600638f3deb172ac9e37f4, ou=PHD, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KIRAN VASANTRAO WAHUL
Date: 2020.09.28 14:43:31 +05'30'

**(किरण वाहूल)**
उप सचिव महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
२. सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठ व क्षय), पुणे-६.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थसंकल्प व प्रशासन), पुणे-१.
४. उपसंचालक, आरोग्य सेवा मंडळे (सर्व).
५. प्रशासक, डॉ.बंदोरवाला कुष्ठरोग रुग्णालय, कोंढवा, पुणे.
६. सहायक संचालक, आरोग्य सेवा सर्व (कुष्ठरोग).
७. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), मुंबई, नागपूर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखाधिकारी, मुंबई.
११. वित्त विभाग, (व्यय-१३),(अर्थसंकल्प-१९), मंत्रालय, मुंबई-३२
१२. अवर सचिव, (सेवा २/३/५ व अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती (आरोग्य-५).